**शासकीय अभियांत्रिकी महावद्यिालय, औरंगाबाद या संस्थेच्या परिसरात जिम्नॅशिअम हॉल व बॅडमिंटन हॉलचे बांधकाम करण्यासाठी तयार करण्यास रु.३००.०४ लक्ष इतक्या खर्चाच्या तयार करण्यात आलेले नकाशे व खर्चाचे ढोबळ अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत ...**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा -२०१३/(१६८/१३)/तांशि-३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मंत्रालय,
विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २८ ऑक्टोबर, २०१४

वाचा

**१)** संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र.: ९(२) /नियोजन/ बांधकाम/ २०१३ - १४ /शाअऔ /२८२२८/७८,दि.४.१०.२०१३ **व** क्र.: ९ (२)/नियोजन/बांधकाम / २०१३-१४/ ३०२, दि. २०.८.२०१४ चे पत्र.

**२)** शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांकः जीईसी-२००९/३६/०९/तांशि-१, दि.१२.३.२००८

**प्रस्तावना**

शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद या संस्थेच्या परिसरात जिम्नॅशियम हॉल व बॅडमिंटन हॉलचे बांधकाम करण्यासाठी तयार करण्यात आलेले नकाशे व सन २००७-०८ च्या दरसूचीप्रमाणे रु.१८८.७४ लक्ष इतक्या रकमेच्या खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र.२ येथील दि.१२.३.२००८ च्या शासन निर्णयाव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. दरसूचीतील दरवाढ व निविदा Escalation Clause प्रमाणे द्यावयाची भाववाढ आणि प्रशासकीय मान्यतेत समाविष्ट नसलेल्या काही बाबींच्या कामावरील खर्च विचारात घेऊन शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद या संस्थेच्या परिसरात जिम्नॅशियम हॉल व बॅडमिंटन हॉलचे बांधकाम करण्यासाठी तयार करण्यात आलेले नकाशे व रु.३००.०४ लक्ष इतक्या रकमेच्या खर्चाचे अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संचालक, तंत्र शिक्षण यांनी संदर्भाधीन पत्रान्वये सादर केला होता. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद या संस्थेच्या परिसरात जिम्नॅशियम हॉल व बॅडमिंटन हॉलचे बांधकाम करण्यासाठी अधिक्षक अभियंता सार्वजनिक मंडळ, औरंगाबाद यांनी साक्षांकीत केलेले नकाशे, व सन २०१०-११ च्या दरसूचीवर आधारीत तयार केलेल्या रु.३००.०४ (रुपये तीन कोटी चार लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या खर्चाचे अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता

देण्यात येत आहे. या सुधारित प्रशासकीय मान्यतेमध्ये EIRL, Fire fighting equipment, Acoustic treatment, इ. नवीन बाबींसह Price Escalation चा समावेश आहे.

३. सदर बांधकामाच्या प्रकरणी यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेल्या रक्कमेपेक्षा जास्त रकमेची तरतूद केली गेली आहे व कंत्राटदारास ही रक्कम प्रत्यक्षात अदा करण्यात देखील आलेली आहे. ही एक वित्तीय अनियमितता आहे. यापुढे अशा स्वरुपाची अनियमितता घडल्यास संबंधितांविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल.

४. प्रस्तुत बांधकामासाठी होणारा खर्च वार्षिक योजना २०१४-१५ मध्ये शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयातील इमारती, प्रयोगशाळा साहित्य इ. कमतरता दूर करणे या बिगर अनुशेषांतर्गत योजनेखालील बांधकामांसाठी मंजूर होणाऱ्या नियतव्ययातून उपलब्ध करुन दिला जाईल व तो "४२०२ - शिक्षण, क्रिडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च - ०२ - तंत्रशिक्षण - १०५ अभियांत्रिकी/तंत्र महाविद्यालय व संस्था - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (४२०२ ६०८६) - मागणी क्र.एच - ८" या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा.

५. हे आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मध्ये नमूद वित्तीय अधिकार नियम-१९७८ भाग-पहिला उपविभाग-५ अ.क्र.१ परिच्छेद क्र.१३४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५४८/इमा.३, दि.६.१.२०१४ तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५८०/१४७१, दि.२६.३.२०१४ व वित्त विभागाच्या अनौपचाकरीक संदर्भ क्र.५९१/१४/व्यय-५, दि.२३.९.२०१४ व्दारे दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२८१६२८३४०५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Audumbar Dharurkar

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2014.11.05 16:46:37 +05'30'

**संजय औ. धारुरकर**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, औरंगाबाद,
३. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद
४. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद

५. कार्यकारी अभियंता सा.बां. विभाग क्र.२, औरंगाबाद
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
८. सार्वजनिक बांधकाम विभाग /नियोजन विभाग / वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अवर सचिव (साशि-१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवड नस्ती/तांशि-३.